वन विभागांतर्गत विधीमंडळाशी संबंधित
कामकाज हाताळताना घ्यावयाची दक्षता.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्र. मविस-२०१५/प्र.क्र.१८०/फ-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- २७ जुलै, २०१५

प्रस्तावना :-

विधान परिषद / विधानसभा सदस्यांकडून विविध आयुधांचा वापर करुन, विधिमंडळाशी संबंधित उपस्थित केल्या जाणाऱ्या बाबींमध्ये तारांकित/अतांराकित प्रश्न, लक्षवेधी, अर्धा तास चर्चा, कपात सूचना, अल्पसूचना प्रश्न, नियम ९३ अन्वये शासनाने करावयाचे निवेदन, शासकीय/अशासकीय ठराव आणि तातडीच्या परिस्थितीत करावयाची निवेदने इत्यादिंचा समावेश असतो.

विधिमंडळ सदस्यांकडून ज्या बाबींवर माहिती विचारली जाते, त्यामागे काही भावना असते. तसेच धोरण प्रक्रिया आणि अंमलबजावणीमध्ये शासनास मार्गदर्शक ठरतील अशाही मुद्यांचा त्यात समावेश असतो. जेणेकरुन त्यातून जनतेचे व्यापक हित साधणे शक्य असते. त्यातूनच संसदीय लोकशाही बळकट होण्यास हातभार लागतो.

यासंदर्भातील सूचना/पत्र विधिमंडळ सचिवालयाकडून विभागास बऱ्याच आधी प्राप्त होत असतात. अशा बाबींसंदर्भात क्षेत्रीय कार्यालयाचा अहवाल घेतला जातो. तथापि, वरील सर्व विषयांसंदर्भात विधीमंडळास उत्तर देताना अत्यंत साचेबंध आणि पारंपारिक पध्दतीने उत्तर दिले जाते, असे निदर्शनास आले आहे.

शासनाकडून विधिमंडळासमोर दिलेल्या उत्तरात शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना/ कार्यक्रम, धोरण आणि कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबी यासंदर्भात करण्यात येणारे जाणिवपूर्वक प्रयत्न आणि संवेदनशिलता प्रतिबिंबीत होणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे जनतेला विकास कामाचा लाभ देण्यासाठी लोकाभिमुख, विकासाभिमुख, उत्तरदायी आणि पारदर्शक शासनाची संकल्पना देखील परावर्तीत होणे अपेक्षित आहे.

**परिपत्रक :**

उपरोक्त बाबींचा विचार करता वन विभागांतर्गत विधीमंडळ कामकाजाबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१) विधिमंडळाकडून सूचना/पत्र प्राप्त झाल्यानंतर त्याविषयाशी संबंधित कार्यासन अधिकारी आणि पर्यवेक्षीय अधिकारी यांनी एकत्रित विचारविनिमय करुन प्राप्त विषयांबाबत मुद्देसूद उत्तर कसे तयार करता येईल, याबाबत तपासणी करावी.

२) विधिमंडळात चर्चा होताना अशा विषयांबाबत कोणते संभाव्य उपप्रश्न अपेक्षित आहेत, याचा अंदाज घ्यावा.

३) अधिकाऱ्यांच्या चर्चेमध्ये उपस्थित झालेल्या वर नमूद अ.क्र.१ आणि २ मधील बाबी विचारात घेऊन शासनाने करावयाच्या ठोस कार्यवाहीबाबतचा अहवाल क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून मागविण्यात यावा.

४) क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून मागविल्या जाणाऱ्या अहवालात ज्या प्रकरणात चौकशी, दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई, अतिक्रमण निर्मुलन दूर करणे इत्यादिचा समावेश असल्यास ती कारवाई पूर्ण करुन अहवालात त्याचा समावेश व्हावा. वन कायद्यांचा भंग होत असल्यास दोषींविरुध्द योग्य ती कारवाई करुन त्याचा देखील समावेश उत्तरामध्ये असणे आवश्यक आहे.

५) ज्या प्रकरणात त्वरित कार्यवाही पूर्ण करणे शक्य नाही, त्या बाबतीत कार्यवाही पूर्ण करण्याचा कालावधी उत्तरामध्ये स्पष्ट करावा.

६) त्याचप्रमाणे पुरवणी टिप्पणीमध्ये सर्व अपेक्षित उपप्रश्नांची उत्तरे असणे आवश्यक आहे. तद्वतच्या ज्या विषयासंबंधी प्रकरण आहे, त्याच्याशी अनुषंगीक योजनांचा उल्लेख उत्तरात/पुरवणी टिप्पणीत करावा.

७) क्षेत्रीय स्तरावर देखील विधिमंडळाशी संबंधित कामकाजाबाबत मागविण्यात आलेल्या विशिष्ट विषयाबाबतच्या माहिती संदर्भात वरिष्ठ स्तरावर विचारमंथन व्हावे. सुधारणेस व तातडीच्या कार्यवाहीसाठी कोठे वाव आहे हे पाहून त्यासंदर्भात सत्वर कार्यवाही करुन त्याचा समावेश उत्तरात/ पुरवणी टिप्पणीत व्हावा.

८) क्षेत्रिय अधिकाऱ्यांचा अहवाल प्राप्त झाल्यावर, त्यामध्ये काही उणिवा, त्रुटी असतील, तर त्याबाबत पुन्हा लगेचच तातडीने माहिती घ्यावी.

९) शासनाकडून देण्यात येणारे उत्तर परिपूर्ण आणि शासनाला जनतेच्या प्रश्नाविषयी जाण, आस्था आणि आत्मियता असल्याचे उत्तरामधून दिसून येईल अशारितीने उत्तर असावे.

१०) त्याचबरोबर विधिमंडळातील चर्चेमध्ये उपस्थित होणाऱ्या संभाव्य प्रश्नांना मा.मंत्री महोदयांना त्याचवेळी तातडीने उत्तर देणे शक्य व्हावे, म्हणून पुरवणी टिप्पणीमध्ये यासंदर्भातील संपूर्ण तपशिलाचा समावेश करण्यात यावा.

११) प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे जनतेच्या प्रश्नांबाबत संवेदनशिलता आणि लोकाभिमुख प्रशासनाची संकल्पना उत्तरामध्ये प्रतिबिंबीत होणे अभिप्रेत आहे.

वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२७१२०५४४८८१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.27 12:08:14 +05'30'

**( डी.एल. थोरात )**

**सहसचिव (वने)**

**प्रत :-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (र.व का.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. खाजगी सचिव, मा. मंत्री (वने) कार्यालय, मंत्रालय, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, वनभवन नागपूर
११.सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२.मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
१३.मुख्य वनसंरक्षक तथा उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
१४.उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
१५.वनसंरक्षक (सर्व)
१६.उप वनसंरक्षक (सर्व)
१७.निवड नस्ती, कार्यासन फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.